जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना - निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो-२०२२/प्र.क्र.१६६/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७ फेब्रुवारी, २०२३

वाचा :-

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक-क्रीडाधो-३११३/(प्र.क्र.५५/१३)/ क्रीयुसे-३, दिनांक २२ मे, २०१४.

२) सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा, शिवछत्रपती क्रीडापीठ, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे यांचे पत्र क्र.शिक्रीपी/तरतूद/क्रीप्रकें/निवि/२०२२-२३/का-१३/४९५, दिनांक ०६ सप्टेंबर, २०२२.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्य क्रीडा क्षेत्रात अग्रगण्य रहावे, नागरिकांमध्ये व्यायामाची आवड जोपासावी, राज्यातील खेळाडूंनी राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर दर्जेदार कामगिरी करण्यासाठी क्रीडा विषयक तंत्रशुध्द प्रशिक्षण, खेळाच्या दर्जात सुधारणा, खेळाडूंना गौरव, दर्जेदार क्रीडा सुविधा या बाबी केंद्रबिंदू मानून खेळाडूंसाठी हितावह योजना राज्यात राबविण्यासाठी क्रीडा धोरण २०१२ तयार करण्यात आलेले आहे. त्याची अंमलबजावणी करण्याबाबत दिनांक २२.०५.२०१४ अन्वये धोरण निश्चित करण्यात आले आहे. त्यातील शिफारशीच्या अनुषंगाने राज्यातील क्रीडापटूंच्या गुणांना वाव मिळण्यासाठी प्रत्येक जिल्हयात प्रशिक्षणाच्या सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्यास संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात आली आहे. या योजनेसाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पीत रु.४५०.०० लक्ष तरतूदीतून ६० टक्केच्या मर्यादेत निधी वित्त विभाग, शासन परिपत्रक दिनांक ०४.०४.२०२२ मधील तरतूदीनुसार उपलब्ध आहे. तथपि, अप्पर मुख्य सचिव (वित्त) यांचे अर्धशासकीय पत्र, दिनांक ०५.०४.२०२२ अन्वये ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टासाठी अर्थसंकल्पीय तरतूदीच्या दरमहा ७ टक्के याप्रमाणे निधी मासिक विवरणानुसार वितरणासाठी उपलब्ध करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार माहे एप्रिल ते सप्टेंबर, २०२२ साठी साठी उपलब्ध ४२% म्हणजे रु.१८९.०० लक्ष निधीतून २४ जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्रांना रु.१,७३,१७,५००/- इतका निधी खर्चासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मागणी क्र.ई-३, प्रधान लेखाशिर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१०) क्रीडा प्रशिक्षण केंद्रांची आस्थापना, (१०)(०३), जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना (२२०४ ५६८२), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाकरीता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पीत रु.४५०.०० लक्ष तरतूदीमधून २४ जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्रांना खालील परिशिष्ट-अ मध्ये दर्शविल्यानुसार एकूण रु.१,७३,१७,५००/- ( रुपये एक कोटी, त्र्याहत्तर लाख, सतरा हजार, पाचशे फक्त) इतका निधी वितरीत करण्यास व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्रांची नावे**

**परिशिष्ट-अ**

| **अ.क्र.** | **जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राचे नाव** | **वितरणासाठी मंजूर रक्कम (रुपये)** |
|---|---|---|
| १ | मुंबई शहर | २५४००० |
| २ | मुंबई उपनगर | ९५३५०० |
| ३ | ठाणे | ६९९५०० |
| ४ | रायगड | ७३२००० |
| ५ | पुणे | ७१९५०० |
| ६ | नाशिक | ९८३५०० |
| ७ | नंदुरबार | ३१९५०० |
| ८ | जळगांव | ६८४५०० |
| ९ | धुळे | ८७०५०० |
| १० | कोल्हापूर | ७५९५०० |
| ११ | सातारा | ८३५५०० |
| १२ | सांगली | ११७२००० |
| १३ | रत्नागिरी | २८४००० |
| १४ | सिंधुदुर्ग | १५१००० |
| १५ | परभणी | ८२७००० |
| १६ | नांदेड | ७२७००० |
| १७ | लातूर | १०४१५०० |
| १८ | नागपूर | ११९२००० |
| १९ | गोंदिया | ५०८५०० |
| २० | चंद्रपूर | ८५२००० |
| २१ | गडचिरोली | ५०८५०० |
| २२ | अमरावती | ८६२००० |
| २३ | अकोला | ६२४५०० |
| २४ | बुलढाणा | ७५६००० |
| | **एकूण- रुपये** | **१,७३,१७,५००** |

**(अक्षरी रुपये एक कोटी, त्र्याहत्तर लक्ष, सतरा हजार, पाचशो फक्त)**

२. उपरोक्त नमूद जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राना खालील अटींच्या अधीन राहून निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. निधी ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेला आहे, त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावा. तसेच, वितरीत निधीच्या विनियोगाबाबत आवश्यक उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

III. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१०) क्रीडा प्रशिक्षण केंद्राची आस्थापना, (१०) (०३) जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना (२२०४ ५६८२), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखालील या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. वित्त विभाग दिनांक ०४.०४.२०२२ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी/उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र-२०.१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,भाग-२ अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०२१७१९१५०६०६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2023.02.17 19:19:10 +05'30'

**( रणसिंग डेरे )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
९. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत)
१०. सर्व जिल्हा कोषाधिकारी (संचालनालयामार्फत)
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)
१२. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (क्रीयुसे-१).